२०११०३१८१५४३१६००१

**नाशिक महानगरपालिका महासभा**
**ठराव क्र.१८७३, दिनांक १.३.२०११ अंशतः**
**निलंबित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.नामपा-२०११/मुमंस-५६/प्र.क्र.८३/११/नवि-२५**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- ९ मार्च,२०११.**

**पहा :-** १) आयुक्त, नाशिक महानगरपालिका याचे जावक क्र.वशि/नस/३१४/२०११ दिनांक ४/३/२०११ चे पत्र.
२) नाशिक महानगरपालिका महासभा ठराव क्र.१८७३, दिनांक १.३.२०११.

**प्रस्तावना:-** नाशिक महानगरपालिकेच्या स्थायी समितीच्या रिक्त जागी मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ३१(अ) नुसार महानरगपालिकेतील पक्षांच्या किंवा गटांच्या संख्याबळाच्या प्रमाणात प्रतिनिधीत्व देऊन सदस्यांच्या नियुक्ती करीता दि. १.३.२०११ रोजी विशेष महासभा बोलाविण्यात आली होती. त्यावेळी महाराष्ट्र नवनिर्माण सेनेच्या नाशिक महानगरपालिकेतील गटनेते श्री. शशीकांत हरिभाऊ जाधव यांनी पक्षाचे नगरसेविका सौ. शिला भागवत व सौ.सुनंदा खरोटे यांची नावे महापौर व नगरसचिव, नाशिक मनपा यांच्याकडे दिली होती. सदर सदस्यांची नावे स्थायी समितीच्या महाराष्ट्र नवनिर्माण सेनेच्या तौलनिक संख्याबळानुसार जाहीर करणे आवश्यक व बंधनकारक असताना , महापौरांनी प्रताप मेहरोलिया व शिला भागवत यांची नावे जाहिर केलीत. श्री. प्रताप मेहरोलिया यांचे नाव महाराष्ट्र नवनिर्माण सेनेच्या गटनेत्याने दिलेले नव्हते.

मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ३१(अ)(२) मध्ये स्थायी समिती सदस्य नियुक्तीबाबत खालीलप्रमाणे तरतुद आहे:-

समिती वा पालिका सदस्यांचे नामनिर्देशन करताना, महानगरपलिका, मान्यताप्राप्त पक्षांचे अथवा नोंदणीकृत पक्षांचे किंवा गटांचे तौलनिक संख्याबळ विचारात घेईल आणि सभागृह नेता, विरोधी पक्षनेता व अशा प्रत्येक पक्षाचा किंवा गटाचा नेता यांच्याशी विचारविनिमय करुन शक्यतोवर, महानगरपालिकेतील अशा पक्षांच्या किंवा गटाच्या संख्याबळाच्या प्रमाणात सदस्यांचे नामनिर्देशन करील.

उपरोक्त अधिनियमातील तरतुद विचारात घेता,नाशिक महानगरपालिका स्थायी समिती सदस्यांच्या निवडीच्या वेळी महाराष्ट्र नवनिर्माण सेनेचे गटनेते श्री. शशीकांत हरिभाऊ जाधव यांनी नामनिर्देशीत केलेली श्रीमती शीला भागवत व श्रीमती सुनंदा खरोटे यांची नावे पीठासीन अधिका-यांनी स्विकारणे आवश्यक होते. तथापि, श्रीमती सुनंदा खरोटे यांच्याऐवजी श्री.प्रताप मेहरोलिया यांची निवड करण्यात

आलेली आहे. ही वस्तुस्थिती पाहता, नाशिक महानगरपालिका महासभा ठराव क्र. १८७३ दि. १.३.२०११ अन्वये स्थायी समिती सदस्यपदी महाराष्ट्र नवनिर्माण सेनेचे श्री.प्रताप मेहरोलिया यांची नार्मानिर्देशनाने केलेली नियुक्ती अवैध असल्याचे दिसून येते.त्यामुळे दि. १.३.२०११ रोजी स्थायी समिती सदस्यपदी श्री.प्रताप मेहरोलिया यांची करण्यात आलेली नियुक्ती रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-** मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५१(१) अन्वये नाशिक महानगरपालिका महासभा ठराव क्र.१८७३ दि. १.३.२०११, श्री. प्रताप मेहरोलिया यांच्या स्थायी समिती सदस्य पदावरील नामनिर्देशनापुरता अंशतः निलंबित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( अ. बा. घरत )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) महापौर, नाशिक महानगरपालिका, नाशिक.
३) आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक.
४) मा.राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.प्रधान सचिव-२ (नवि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) नगर विकास विभाग, नवि-२९, मंत्रालय, मुंबई (वेबसाईटवर प्रसिध्दीकरिता)
७) निवडनस्ती (नवि-२५) (२ प्रती)